/ 20100811184051001

विकास योजना - जालना (सुधारीत)

सर्व्हे क्र.२८५ (भाग) मधिल २ हे ४० आर हि जमिन ना विकास विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करण्याबाबत.

महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम - ३७(१) अन्वये फेरबदल प्रस्तावास मंजूरीबाबत.

महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

अधिसूचना क्र.टिपीएस-२९०९/७३१/प्र.क्र.१८५/२००९/नवि-३०

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक : ०४ ऑगस्ट, २०१०.

**पहा :-** अ) मुख्याधिकारी, जालना नगरपरिषद, यांचे पत्र जा.क्र.नपजा/नरवि/स.क्र.२८५ (भा.)/२१७१, दि.०९/१०/२००९

ब) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.वियो जालना/२८०-२००९/टिपीव्ही-५/७९०१, दि.३०/१२/२००९

**शासन निर्णय :-** सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

(शिवाजी पाटणकर)

महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

**प्रति,**

विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद

जिल्हाधिकारी, जालना

संचालक, नगररचना, पुणे.

उप सचिव (नगर रचना) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप संचालक, नगररचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद

(त्यांना विनंती करण्यात येते की, मंजूर अधिसूचनेनुसार भाग नकाशे अधिप्रमाणीत करण्याकरिता शासनास सादर करावे.)

नगररचनाकार, जालना शाखा, जालना

मुख्याधिकारी ,जालना नगरपरिषद, जालना

व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद

त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्राच्या औरंगाबाद विभागीय पुरवणीमध्ये प्रसिध्द करुन त्याच्या प्रत्येकी १० प्रती या विभागास व संचालक, नगररचना, पुणे यांना पाठवाव्यात.

कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी प्रस्तुत अधिसूचना वेब साईटवर प्रसिध्द करावी.निवड नस्ती, कार्यासन नवि-३०.

Forwarding GR/F

**अधिसूचना**
**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :०४ ऑगस्ट, २०१०.**

**क्रमांक :टिपीएस-२९०९/७३१/प्र.क्र.१८५/२००९/नवि-३०:-**

महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६.

ज्याअर्थी जालना शहराची सुधारित विकास + वाढीव क्षेत्राची विकास योजना (भागशः) शासन अधिसूचना क्रमांक : टीपीएस-२९८४/ २५८८/ प्र.क्र.३२६ (बी)/ नवि-६, दिनांक १७ मे, १९८५ अन्वये मंजूरी झाली असून ती दिनांक १५ जुलै १९८५ पासून अंमलात आली आहे. तर सुधारित वाढीव क्षेत्राची विकास योजना शासन अधिसूचना क्र.टीपीएस-२९८६/ ६७१/ प्र.क्र.८९/ नवि-१२, दिनांक ४ एप्रिल, १९८९ अन्वये मंजूर झाली असून ती दिनांक २५ मे १९८९ पासून अंमलात आली आहे (यापुढे "उक्त विकास योजना" असे उल्लेखिलेली ) ;

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेत सर्व्हे क्र. २८५ भागशः मधील २ हे ४० आर क्षेत्र ना विकास विभागात समाविष्ट आहे [यापुढे "उक्त क्षेत्र" असे उल्लेखिलेले] ;

आणि ज्याअर्थी, जालना नगरपरिषदेने (यापुढे "उक्त नगरपरिषद" असे उल्लेखिलेले) उक्त क्षेत्र ना विकास विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करण्याचा महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे [महाराष्ट्र १९६६ चा ३७ वा] [यापुढे "उक्त अधिनियम" असे उल्लेखिलेला] कलम-३७ च्या उपकलम १ अन्वये फेरबदलाचा प्रस्ताव (यापुढे "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे उल्लेखिलेला) आवश्यक ती वैधानिक कार्यवाही पूर्ण करुन शासनास मंजूरीसाठी सादर केला आहे ;

आणि ज्याअर्थी, संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेऊन व आवश्यक त्या चौकशी नंतर उक्त फेरबदल प्रस्ताव अटीवर मंजूर करणे आवश्यक आहे असे राज्य शासनाचे मत झाले आहे ;

त्याअर्थी, आता उक्त अधिनियमाचे कलम ३७ [२] अन्वये व त्या अनुषंगाने असलेल्या इतर अधिकारांचा वापर करुन उक्त विकास योजनेतील उक्त फेरबदल प्रस्ताव मंजूर करण्यात येत आहे आणि त्यासाठी उपरोल्लेखित दिनांक ४ एप्रिल १९८९ ची विकास योजना मंजूरीची अधिसूचना पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे ;

उक्त विकास योजना मंजुरीच्या अधिसुचनेच्या शेवटच्या नोंदीनंतर पुढील नोंदीचा समावेश करण्यात येत आहे.

## नोंद

"जालना शहराच्या सुधारित विकास योजनेतील सर्व्हे क्र.२८५ भागशः मधील नकाशात दर्शविल्याप्रमाणे २ हे ४० आर क्षेत्र ना विकास विभागातून वगळून खालील अटीवर रहिवास विभागात समाविष्ट करण्यात येत आहे."

अट : फेरबदलाखालील क्षेत्राचा अभिन्यास करताना त्यामध्ये १०% अनिवार्य खुल्या जागेव्यतिरिक्त अतिरीक्त १०% क्षेत्र सार्वजनिक सुविधांसाठी सोडण्यात यावे.

टिप :- वरील बदल दर्शविणारा, विकास योजनेचा भाग नकाशा जालना नगर परिषदेच्या कार्यालयात कार्यालयीन वेळेत नागरिकांच्या अवलोकनार्थ खुला ठेवण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

{ शिवाजी पाटणकर }
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

Forwarding GR/F:

## NOTIFICATION

**Government of Maharashtra**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated :- 04 August, 2010.**

**No. TPS-2909/731/CR-185/2009/UD-30:-**

...arashtra ...onal & ...in ...ning Act ...6

Whereas the Development Plan of Jalna (Revised + Additional area) has been sanctioned vide Notification No.TPS-2984/2588/C.R.-326(B)/UD-6, Dated 17th may, 1985 wihch came into force from 15th July of 1985 & the Revised Development Plan of Jalna [hereinafter referred to as "the said Development Plan"]; has been sanctioned vide Notification No. TPS-2986/671/CR-89/UD-12, dated 04 April, 1989 which came into force from 25 May, 1989 ;

And whereas in the said Development Plan the land bearing Survey No.285(part), having area 2 H 40 Are [hereinafter referred to as "the said land"] is included in the no development zone;

And whereas Jalna Municipal Council [hereinafter referred to as "the said Municipal Council"] has submitted the modification proposal to delete the said land from no development zone & to include the said land in the residential zone [hereinafter referred to as 'the saod modification'] to Government for sanction after following all the legal procedure stipulated under section 37(1) of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 [Maharashtra XXXVII of 1966][hereinafter referred to as "the said Act"] ;

And whereas after making necessary enquiries and after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune the Government of Maharashtra is of the opinion that the said land should be included in the residential zone with some condition;

Now therefore, in exercise of powers conferred under sub-section [2] of section 37 of the said Act, Government hereby sanctions the said modification & for that purpose amends the above referred Notification No.TPS-2984 /2588/ C.R.- 326(B)/ UD-6, Dated 17th may, 1985;

In the Schedule of Modification appended to the Notification sanctioning the said Development Plan, following new entry shall be added;

**ENTRY**

"The land bearing Survey No.285(part), admeasuring 2 H 40 Are is deleted from the no development zone & included in the Residential Zone as shown on the part plan of Revised Development Plan of Jalna subject to following condition."

**condition:-** In the layout of the said land in addition to 10% compulsory layout open space, 10% amenity space shall be shown.

**Note:-** The aforesaid part plan showing the above modification is kept open for inspection for the public in the office of the Chief Officer, Jalna Municipal Council, Jalna during Office hours.

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

**[ Shivaji Patankar ]**
**Under Secretary to Government**

*Forwarding GR/F:*